महाराष्ट्र जलसंधारण महामंडळाकरिता नाबार्ड अर्थसहाय्य अंतर्गत आरआयडीएफ कर्जाव्दारे वितरण (सन २०२३-२४)

**महाराष्ट्र शासन**
**मृद व जलसंधारण विभाग**
**शासन निर्णय क्र. मजम-२०२३/प्र.क्र.२७५/जल-३**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २२ मार्च, २०२४

**वाचा :-** १) शासन निर्णय, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थसं-३, दि.१२ एप्रिल, २०२३ व दि. ४ मार्च, २०२४
२) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र जलसंधारण महामंडळ, औरंगाबाद यांचे पत्र क्र. म.ज.स.म.ले-१/१६७६, दि. २२ ऑगस्ट, २०२३ व दि. २१, मार्च, २०२४.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र जलसंधारण महामंडळाकरीता रत्नागिरी व सिंधुदूर्ग जिल्हयातील जलसंधारणांच्या योजना /कामे पुर्ण करण्यासाठी नाबार्ड अर्थसहाय्यित "ग्रामीण पायाभूत विकास निधी" मधून सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरीता रु. १५०.०० कोटी निधीची मागणी करण्यात आली होती. नाबार्ड अर्थसहाय्यित "ग्रामीण पायाभूत विकास निधी" (RIDF) मालिका-२९ करीता योजनेंतर्गत सन २०२३-२४ या वर्षाकरीता मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली दि. २२.०६.२०२३ रोजीच्या झालेल्या बैठकीमध्ये उच्चस्तर समितीने अंतरिम कर्जनिधी विभागास रु. १५०.०० कोटी रकमेस मान्यता देण्यात आली आहे.

तरी महाराष्ट्र जलसंधारण महामंडळामार्फत रत्नागिरी व सिंधुदूर्ग जिल्हयातील जलसंधारणाच्या योजनांसाठी झालेल्या खर्चास रु. १५०.०० कोटी निधी वितरणासाठी उपलब्ध करुन दिला आहे. सदर उपलब्ध झालेला निधी महामंडळाला वितरीत करण्याबाबत शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**निर्णय :-**

महाराष्ट्र जलसंधारण महामंडळाकरिता नाबार्ड अर्थसहाय्य अंतर्गत आरआयडीएफ कर्जाव्दारे स्वरुपात रुपये १५०.०० कोटी (अक्षरी रुपये एकशे पन्नास कोटी फक्त) इतका निधी वितरित करण्यासाठी याव्दारे, शासनाने मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. उपरोक्त निधी कोषागारातून आहरीत करुन व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र जलसंधारण महामंडळ, औरंगाबाद यांच्या नांवे वितरित करण्यासाठी प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, औरंगाबाद यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

३. यावर होणारा खर्च खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा.

**मागणी क्रमांक-झेडएच-५,**
प्रधान लेखाशिर्ष ४७०२,
मृद व जलसंधारण यावरील भांडवली खर्च,
१०१ भूपृष्ठ जल,
(०१) लहान पाटबंधारे,
(०१)(०४) नाबार्ड अर्थसहाय्य अंतर्गत आरआयडीएफकर्जाव्दारे ० ते ६०० हेक्टर सिंचन क्षमतेची कामे (कार्यक्रम) (४७०२ ए४४९),
५३, मोठी बांधकामे

४. प्रस्तुत निधीच्या विनियोगासाठी वित्त विभागाच्या संदर्भीय परिपत्रकांमधील सूचनांचे अनुपालन करण्यात यावे.

५. प्रस्तुत वरीलप्रमाणे उपलब्ध होणाऱ्या निधीमधून महामंडळाच्या नियोजनानुसार भूसंपादनाच्या प्रकरणांचे दायित्व अदा करण्यात यावे.याप्रमाणे भूसंपादनावार होणाऱ्या खर्चाच्या हिशेब करुन निधी शिल्लक रहात असल्यास तशी माहिती शासनास देण्यात यावी

६. निधी वितरणासंदर्भात शासनाच्या निदेशांचे अनुपालन करण्यात आले नाही किंवा काही भंग झाल्यास व त्यामुळे भविष्यात काही तक्रारी किंवा न्यायालयीन प्रकरणे उद्भवल्यास त्याची सर्वस्वी जबाबदारी ही व्यवस्थापकीय संचालक व मुख्य लेखा व लेखापरीक्षा अधिकारी (CAFO), महाराष्ट्र जलसंधारण महामंडळ, औरंगाबाद यांची राहील.

७. प्रस्तुत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३२२१६०६३७९२२६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUNIL SAHEBRAO CHAVAN

Digitally signed by SUNIL SAHEBRAO CHAVAN
DN: c=IN, o=PERSONAL, title=1152, pseudonym=70c49d01174e4dfab06502f46f2d08ee, 2.5.4.20=9d7028d657473ced7f06a53cd1e784304afc1095acc4acd7bff3e05534877677, postalCode=400706, st=Maharashtra, serialNumber=d0238af6efc5bfde130aafbba0dfef2783f5a0b209db0e695ff6c2a3209ea790, cn=SUNIL SAHEBRAO CHAVAN
Date: 2024.03.22 17:22:29 +05'30'

**( सुनील चव्हाण )**
**सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

**१.** व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र जलसंधारण महामंडळ, औरंगाबाद.
**२.** अपर आयुक्त, मृद व जलसंधारण विभाग,प्रादेशिक क्षेत्र, पुणे/औरंगाबाद/नागपूर
**३.** प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, (सर्व)
**४.** मुख्य लेखा व लेखापरीक्षा अधिकारी (CAFO), महाराष्ट्र जलसंधारण महामंडळ, औरंगाबाद
**५.** महालेखापाल, ( लेखापरीक्षा / लेखाअनुज्ञेयता ), २, महाराष्ट्र राज्य, नागपूर
**६.** अधिदान व लेखा अधिकारी / निवासी लेखापरीक्षा, नागपूर
**७.** वरीष्ठ कोषागार अधिकारी, लेखाकोष भवन, औरंगाबाद.
**८.** जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद.
**९.** नियोजन विभाग (का.१४३४), मंत्रालय, मुंबई
**१०.** वित्त विभाग ( व्यय-१५ ) / साऊ /अर्थबळ/मंत्रालय, मुंबई
**११.** कक्ष अधिकारी, कार्यासन क्रमांक जल-११, मृद व जलसंधारण विभाग,मंत्रालय, मुंबई.
**१२.** निवडनस्ती/कार्यासन जल-३.

**प्रत अग्रेषित,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
२. मा. विरोधी पक्षनेता (विधान परिषद) विधानमंडळ, मुंबई यांचे खाजगी सचिव.
३. मा. मंत्री (मृद व जलसंधारण) यांचे खाजगी सचिव
४. मा. विरोधी पक्षनेता (विधान सभा) विधानमंडळ, मुंबई यांचे खाजगी सचिव.
५. स्थानिक लोकप्रतिनिधी (मार्फत संबंधित मृद व जलसंधारण उपविभागिय अभियंता).
६. प्र.स., मृद व जलसंधारण यांचे स्वीय सहायक.
७. आयुक्त, मृद व जलसंधारण, महाराष्ट्र राज्य, औरंगाबाद.